राजीव गांधी प्रशासकीय गतिमानता (प्रगती) अभियान व स्पर्धा -२०१६या वर्षाकरिता राज्यस्तरावरिल विजेत्या कार्यालयांना पारितोषिकाची रक्कम मंजूर करणेबाबत...

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः रागांअ-१११६/प्र.क्र.५४/१८अ,**
हुतात्मा राजगुरू चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय,(विस्तार) मुंबई-४०००३२.
तारीख: ३० मार्च,२०१७

**वाचा** :- १) शासन निर्णय क्रमांकः सा.प्र.वि., प्रसुधा-१००२/प्र.क्र.७६/२००२/१८-अ, दि. ०२.०८.२००२
२) शासन पत्र क्रमांकः सा.प्र.वि., रागांअ-१०१०/प्र.क्र.१५८/१०/१८-अ, दि.१६.०३.२०११

**प्रस्तावना :-**

संदर्भ क्र.१ दि. ०२.०८.२००२ च्या शासन निर्णयानुसार राजीव गांधी प्रशासकीय गतिमानता (प्रगती)अभियान व स्पर्धा राज्यात दरवर्षी राबविण्यात येतात.शासन निर्णय ,सामान्य प्रशासन विभाग क्र.रागांअ-२०१०/प्र.क्र.१५८/१०/१८-अ,दि.१६ मार्च २०११ च्या शासन निर्णयान्वये राज्यस्तरावरील प्रथम, व्दितीय व तृतीय क्रमांकाच्या विजेत्या कार्यालयांना अनुक्रमे १० लक्ष, ६ लक्ष, ४ लक्ष रुपयांचे पारितोषिक मंजूर करण्यात येते.

**शासन निर्णय :-**

राजीव गांधी प्रशासकीय गतिमानता (प्रगती) अभियान व स्पर्धा-२०१६ अंतर्गत राज्यस्तरीय स्पर्धेत समितीने निवडलेल्या कार्यालयांना पुढीलप्रमाणे पारितोषिकाची रक्कम मंजूर करण्यात येत आहे:-

| अ.क्र. | कार्यालयाचे नाव | क्रमांक | पारितोषिकाची रक्कम |
|---|---|---|---|
| १ | महाराष्ट्र मेरीटाईम बोर्ड, मुंबई | प्रथम | रु.१०,००,०००/- (रु.दहा लाख फक्त) |
| २ | पोलीस अधिक्षक, रत्नागिरी | व्दितीय | रु.६.००.०००/- (रु.सहा लाख फक्त) |
| ३ | जिल्हाधिकारी, रायगड | तृतीय | रु.४.००.०००/- (रु.चार लाख फक्त) |
| | एकूण | | रु.२०,००,०००/- (रु.वीस लाख फक्त ) |

उपरोक्त नमूद केल्याप्रमाणे एकूण रु.२०,००,०००/- (रुपये वीस लाख फक्त ) इतकी रक्कम संबधित कार्यालयांना धनादेशाव्दारे उपलब्ध करून देण्यास मंजूरी देण्यात येत आहे.याकरिता अवर सचिव, रोख शाखा, सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

या प्रित्यर्थचा चालू आर्थिक वर्षातील खर्च खालील लेखाशीर्षाखाली सन २०१६-२०१७ च्या अर्थ संकल्प मंजूर केलेल्या अर्थसंकल्पीय तरतूदीमधून खर्ची टाकण्यात यावा:-

"मागणी क्र.ए-४,प्रधानशीर्ष -"२०५२" सचिवालय सर्वसाधारण सेवा "०९०" सचिवालय ( ००) (०१) सामान्य प्रशासन विभाग, दत्तमत (संकेतांक क्र.२०५२००२५)-०५-बक्षिसे".

पारितोषिकाच्या रकमेचा वापर विजेत्यांनी कार्यालयीन सुधारणेसाठीच करावयाचा आहे. महाराष्ट्र अर्थसंकल्प नियम पुस्तिकेमधील नमुना क्रमांक १० मध्ये खर्चाचा तपशील ठेवण्यात यावा व खर्चाबाबतचे उपयोगिता प्रमाणपत्र विहित नमून्यात, खर्चाची कारणे व सांक्षाकित देयकांच्या प्रतीसह धनादेश मिळाल्यापासून एक महिन्याच्या आत अवर सचिव ,सामान्य प्रशासन विभाग / कार्यासन १८-अ व अवर सचिव तथा आहरण व संवितरण अधिकारी, कार्यासन २६, मंत्रालय, मुंबई -३२ यांना सादर करण्याबाबत दक्षता घ्यावी.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०३३१११३८२००००७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Santosh Vithal Rokade

Digitally signed by Santosh Vithal Rokade
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=GAD, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=ca5751ffedbb005fdff34ab6ac1f8319d061483d7d35e20f744e251360f7920a, cn=Santosh Vithal Rokade
Date: 2017.03.31 11:40:50 +05'30'

**(संतोष रोकडे)**
**अवर सचिव , सामान्य प्रशासन विभाग**

**प्रत,**

१) जलआलेखक, महाराष्ट्र मेरीटाईम बोर्ड, मुंबई
२) पोलीस अधिक्षक, रत्नागिरी
३) जिल्हाधिकारी, जिल्हाधिकारी कार्यालय, रायगड
४) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)/(लेखा परीक्षा)-महाराष्ट्र-१,मुंबई (प्रत्येकी २ प्रती),
५) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)/(लेखा परीक्षा)-महाराष्ट्र-२,नागपूर (प्रत्येकी २ प्रती),
६) निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई,
७) जिल्हा कोषागार अधिकारी मुंबई /अमरावती,
८) वित्त विभाग/ व्यय-४,
९) अवर सचिव, सामान्य प्रशासन विभाग / का.क्र. २५ व २६
१०) निवड नस्ती, का. १८-अ.